सेंद्रिय शेती/ विषमुक्त शेती या राज्यपुरस्कृत योजनेअंतर्गत डॉ. पंजाबराव देशमुख <u>जैविकशेती मिशन राबविणे.</u>

महाराष्ट्र शासन
कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग
शासन निर्णय क्र. जैशेमि १०१८/प्र.क्र. १२५/१७-अे
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक :- १६/१०/२०१८

<u>प्रस्तावना</u> :-

अन्नधान्याच्या आणि संकरीत वाणांच्या तसेच इतर पिकांच्या अधिक उत्पादनासाठी रासायनिक खते, किटकनाशके, बुरशीनाशके आणि तणनाशकांचा मोठ्या प्रमाणात वापर करण्यात येतो. त्यामुळे पर्यावरणाचे संतुलन बिघडून जमिनीतील जैविक घटकांचा विनाश झाल्याने जमिनी मृतवत होत चालल्या आहेत. त्यामुळे मानव व पशुपक्षी यांच्या आरोग्यावर विपरीत परिणाम होत आहेत. यामुळे कॅन्सर सारखे दुर्धर आजार मानवास मोठ्या प्रमाणात जडत आहेत. विदर्भातील यवतमाळ जिल्ह्यात सन २०१७-१८ मध्ये अनेक शेतमजूर आणि शेतकरी यांना किटकनाशकांची विषबाधा होऊन ते मृत्यूमुखी पडले आहेत. तसेच रासायनिक खताचे वापरामुळे जमिनी कडक होत आहेत. त्यामुळे मशागतीचा खर्चात वाढ झाली आहे. तसेच रासायनिक निविष्ठांचे खरेदीसाठी मोठा खर्च करावा लागतो. परिणामी उत्पादन खर्च वाढून शेतकरी कर्जबाजारी होत आहेत.

यास पर्याय म्हणून विषमुक्त सेंद्रिय शेतीस प्रोत्साहन देणे हि नितांत गरज आहे. राज्याने यासाठी "सेंद्रिय शेती धोरण" मंजूर केले आहे.

जैविक पध्दतीने उत्पादीत शेतमालाचे सेंद्रिय प्रमाणीकरण, प्राथमिक प्रक्रिया, बाजारपेठ श्रृंखला, समुह गट स्थापन करुन त्या माध्यमातून शेती उत्पादनांना बाजारपेठेसोबतच योग्य भाव मिळू शकेल. यातून शेतकऱ्यांचा उत्पादन खर्च कमी होऊन निव्वळ नफ्यात वाढ होऊन तीन वर्षात उत्पन्न दुप्पटीने वाढवणे शक्य होईल. यासाठी राज्य पुरस्कृत सेंद्रिय शेती / विषमुक्त शेती हि योजना राज्यामध्ये राबविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

<u>शासन निर्णय</u> :-

१) राज्य शासनाने सदर बाबींचा विचार करुन सेंद्रिय शेती/विषमुक्त शेती योजना राज्यात राबवण्यास मंजूरी दिली आहे. सदर योजना प्रथम टप्यात विदर्भातील शेतकरी आत्महत्याग्रस्त जिल्हयात म्हणजेच, अकोला, बुलढाणा, वाशीम, यवतमाळ, अमरावती आणि वर्धा या ६ जिल्हयामध्ये सुरु करुन टप्याटप्याने या योजनेची व्याप्ती राज्याचे इतर जिल्ह्यांमध्ये वाढविण्यात येणार आहे. तसेच, सेंद्रिय शेती / विषमुक्त शेती या राज्य पुरस्कृत योजनेअंतर्गत डॉ. पंजाबराव देशमुख जैविक शेती मिशनची स्थापना करुन त्याची अंमलबजावणी राष्ट्रीय शाश्वत शेती अभियान (NMSA) अंतर्गत परंपरांगत कृषि विकास योजना (PKVY) या योजनेच्या धर्तीवर करण्यात येईल.

२) सदर प्रयोजनार्थ सेंद्रिय शेती मिशनची स्थापना करण्यास पुढील प्रमाणे मान्यता देण्यात येत आहे.

मिशनचे नांव :- डॉ. पंजाबराव देशमुख जैविक शेती मिशन
अध्यक्ष :- सेंद्रिय शेती विषयक तज्ज्ञ
मिशन मुख्यालय :- अकोला
कार्यक्षेत्र :- अकोला, बुलढाणा, वाशीम, यवतमाळ, अमरावती आणि वर्धा जिल्हा
कार्यकाळ :- ४ वर्षे - (६ महिने आस्थापना व नियोजन, ३ वर्षे अंमलबजावणी आणि ६ महिने मुल्यांकन व अहवाल)
आर्थिक भार :- रुपये १०० कोटी (४ वर्षासाठी) रु. लाखात

| | |
|---|---|
| वर्ष १ ले | - रु. २०१०.५०/- |
| वर्ष २ रे | - रु. ४०३०.००/- |
| वर्ष ३ रे | - रु. २७२६.००/- |
| वर्ष ४ थे | - रु. १२३३.५०/- |
| **एकूण** | **- रु. १०,०००.००/-** |

३) <u>उद्दिष्ट्ये</u> :-

१) जैविक शेती पध्दतीव्दारा, रसायनांचा वापर थांबवून योग्य उत्पादन घेणे, जमीन आरोग्य सुधारणे,
२) निवडलेल्या उत्पादक गटांची आणि वैयक्तिक शेतकरी यांची क्षमता विकसित करणे. त्यासाठी सेंद्रिय शेतीसाठी आवश्यक जैविक निविष्ठा जसे जमिन सुपिकता व पिकसंरक्षणासाठी आवश्यक असणाऱ्या निविष्ठा शेतकऱ्यांच्या शेतावर सेंद्रीय पध्दतीने तयार करणे, शेतीमध्ये रसायनांचा वापर पूर्णपणे थांबविणे,
३) समुह संकल्पनेनुसार ५०० उत्पादक गटांची स्थापना करणे,
४) चार ते पाच उत्पादक गटांमधून एक समुह संगठन केंद्र (Cluster Agrigation Centre) स्थापन करणे,
५) सेंद्रिय शेती प्रमाणिकरण पीजीएस ईंडिया आणि आयसीएस पध्दतीने करणे,
६) उत्पादीत सेंद्रिय उत्पादनांची प्रक्रिया व मुल्यवृध्दी करणे. CAC मार्फत बाजार श्रृंखला निर्माण करणे,
७) प्रकल्प कालावधी संपल्यानंतर हे कार्य सुरळीत सुरु राहण्यासाठी सशाक्त निर्गमन व्यवस्था' (Exit Plan) विकसित करणे.

४) **<u>प्रमुख वैशिष्टये</u>** :-

अ) मिशन प्रथम अवस्थेत विदर्भातील आत्महत्याग्रस्त/ नैराश्यग्रस्त अशा अकोला, अमरावती, बुलढाणा, वाशिम, यवतमाळ व वर्धा जिल्हयात राबविले जाईल,
ब) यामध्ये १०,००० ते १२,००० शेतकरी कुटूंबाचा समावेश असेल,

क) जैविक शेती अंतर्गत समूह संघटन संकल्पनेवर आधारीत २५,००० एकर क्षेत्राचा समावेश असेल, यामध्ये ५० एकरचा एक गट ज्यामध्ये २० ते ३० शेतकरी असतील. प्रति शेतकरी मर्यादा २ हेक्टर पर्यंत राहील,

ड) शेतकऱ्यांचा शेती उत्पादन खर्च कमी करुन आणि प्रक्रियेद्वारे मुल्यवृध्दी व बाजार व्यवस्थेतून तीन वर्षात उत्पन्न दुप्पट होण्याचे अपेक्षित आहे.

**५)** डॉ. पंजाबराव देशमुख जैविक शेती मिशनची संरचना खालील प्रमाणे असेल.

५.१ <u>मिशन प्रकल्प संरचना</u> :-

डॉ. पंजाबराव देशमुख जैविक शेती मिशन या नावाने संस्थेची स्थापना सोसायटीज ॲक्ट १९८० अंतर्गत धर्मदाय आयुक्त यांचेकडे नोंदणी करण्यात येईल.

| | |
|---|---|
| अध्यक्ष | :- सेंद्रिय शेती विषयक तज्ज्ञ |
| उपाध्यक्ष | :- आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे |
| सदस्य | :- कुलगुरु, डॉ. पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला |
| सदस्य | :- कुलगुरु, वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ परभणी |
| सदस्य | :- कृषि संचालक (आत्मा), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पूणे |
| सदस्य | :- कृषि संचालक (निविष्ठा व गुणनियंत्रण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पूणे |
| सदस्य | :- विभागीय कृषि सहसंचालक, अमरावती |
| सदस्य | :- प्रादेशिक सह आयुक्त, पशुसंवर्धन, अमरावती |
| सदस्य | :- उपसरव्यवस्थापक (पणन, अमरावती ) |
| सदस्य | :-विभाग प्रमुख, सेंद्रिय शेती संशोधन व प्रशिक्षण केंद्र , डॉ. पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला |
| सदस्य | :- क्षेत्रिय व्यवस्थापक, क्षेत्रिय जैविक शेती केंद्र, नागपूर |
| सदस्य | :- सेंद्रिय शेती विषयक तज्ज्ञ (तीन सदस्य) शासकीय/ अशासकीय |
| सदस्य-सचिव | :- प्रकल्प व्यवस्थापन युनीट मधील कृषि सहसंचालक / अधीक्षक कृषि अधिकारी |

उपरोक्त संरचनेस मिशन प्रोजेक्ट मॅनेजमेंट बोर्ड (MPMB) असे संबोधण्यात येईल.

<u>अधिकार व कार्ये</u> :-

१) सेवा प्रदाताची (Service Provider) व प्रमाणिकरण यंत्रणेची (प्रादेशिक परिषद पी.जि.एस) जिल्हानिहाय नियुक्ती करणे

२) जिल्हा निहाय प्रकल्प आराखड्यास मंजुरी देणे,

३) मिशन प्रकल्पासाठी शासनाकडून निधीची मागणी करणे,

४) प्रकल्प व्यवस्थापन युनिट (PMU) आणि जिल्हा व्यवस्थापन युनिटची (DMU) स्थापना करणे,

५) मिशन कार्याचा सहामाही आढावा,

६) PMU व्दारा झालेल्या खर्चास मंजूरी देणे.

७) योजनेच्या मुख्य घटकातंर्गत अंमलबजावणीसाठी उपघटक व कार्यपध्दती निश्चित करणे.

८) मिशनच्या वार्षिक लेखा परिक्षण अहवालास मान्यता देणे.

मिशन प्रोजेक्ट मॅनेजमेंट बोर्डाच्या कार्याचे संचलन करण्यासाठी प्रकल्प व्यवस्थापन युनिट (PMU ) कार्यरत राहिल.

### ५.२ <u>प्रकल्प व्यवस्थापन युनिट (PMU)</u> :-

प्रकल्प व्यवस्थापन युनिटची संरचना खालीलप्रमाणे असेल.

१) प्रकल्प संचालक :- सहसंचालक (कृषि) (प्रतिनियुक्तीने) /अधीक्षक कृषि अधिकारी (प्रतिनियुक्तीने) अधीक्षक कृषि अधिकारी यांची प्रतिनियुक्तीने नियुक्ती झाल्यास सहसंचालक (कृषि) यांची वेतन श्रेणी अनुज्ञेय राहील.

२) कृषि उपसंचालक :- कृषि विभागातून प्रतिनियुक्तीने

३) लेखाधिकारी (गट-ब) :- वित्त विभागाकडून प्रतिनियुक्तीने नेमणूक

४) या व्यतिरिक्त आवश्यक कर्मचारी वर्ग तात्पुरत्या स्वरुपात बाहय स्त्रोताद्वारे मिशनच्या मान्यतेने घेण्याचे अधिकार प्रकल्प संचालक यांना राहतील.

### ५.३ <u>जिल्हा व्यवस्थापन युनिट (DMU)</u> :-

प्रकल्प संचालक (आत्मा), कृषि तंत्रज्ञान व्यवस्थापन यंत्रणा हे जिल्हास्तरावर मिशनचे कार्यान्वयन अधिकारी राहतील व त्याना मिशनची अमंलबजावणी करणेसाठी आवश्यक कर्मचारी वर्ग तात्पुरत्या स्वरुपात बाहय स्त्रोताद्वारे मिशनच्या मान्यतेने देण्याचे अधिकार प्रकल्प संचालक (PMU) यांना राहतील.

### ५.४ <u>जिल्हा स्तरीय समिती</u> :-

**५.१)** जिल्हास्तरीय समितीची संरचना खालीलप्रमाणे असेल :-

| | | |
|---|---|---|
| १) | जिल्हाधिकारी | :- अध्यक्ष |
| २) | जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी | :-सदस्य |
| ३) | प्रतिनिधी विभागीय परिषद (Regional Council) | :- सदस्य |
| ४) | शेतकरी | :- सदस्य |
| ५) | महिला शेतकरी | :- सदस्य |
| ६) | जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी | :- सदस्य |
| ७) | प्रकल्प संचालक ,आत्मा | :- सदस्य सचिव |

५.२) <u>कार्य व अधिकार</u> :-

अ) मिशन अंतर्गत मंजूर झालेल्या आराखड्यानुसार लक्षांक पुर्तीचा आढावा,

ब) अभिसराणाद्वारे प्रस्तावित कामांना मंजुरी,

क) मिशनमध्ये नाविण्यपूर्ण कार्याची शिफारस करणे,

ड) मिशन कार्यास गती देण्यासाठी योग्य ते निर्देश देणे.

६) <u>कार्यप्रणाली</u> :- **मिशन कार्यक्षेत्रात ५०० सेंद्रिय शेती उत्पादक गटांची समुह संकल्पनेनुसार निवड करणे.**

६.१ <u>शेतकरी गट निर्मिती व क्षमता विकास</u>

**६.१.१)** किमान २० शेतकरी व ५० एकर क्षेत्रात गटाची निर्मिती करणे

**६.१.२)** प्रत्येक गटासाठी गट प्रवर्तक (L.R.P.) व एक सहाय्यक गट प्रवर्तक अशा दोन व्यक्तीची निवड करणे व त्यांना विशेष प्रशिक्षण व्यवस्था करणे.

**६.१.३)** क्षेत्रीय भेटीद्वारे गटातील शेतकऱ्यांमध्ये आत्मविश्वास जागृत करणे.

**६.१.४)** गटातील शेतकऱ्यांचे स्थानिक परिस्थितीनुरुप पिकांच्या स्थितीनुसार वर्षातून ४ वेळा एक दिवसीय प्रशिक्षणाचे आयोजन करणे.

**६.१.५)** गटाची नोंदणी आत्मा अंतर्गत करणे.

**याबाबी अंतर्गत देय अर्थसहाय्य खालीलप्रमाणे राहील.**

| अ.क्र. | बाब | परिमाण | देय अर्थसहाय्य (रु. लाख) |
|---|---|---|---|
| १ | गट प्रमुख / सहाय्यक गट प्रमुख यांचे ७ दिवसीय विशेष प्रशिक्षण | रु. १०००/- प्रति प्रशिक्षणार्थी | ०.१४ |
| २ | क्षेत्रीय भेट | रु. ४००/- प्रति शेतकरी | ०.१० |
| ३ | शेतकरी प्रशिक्षण (एक दिवसीय ४ प्रशिक्षण प्रति वर्ष, ३ वर्षासाठी १२ प्रशिक्षण ) | रु. ४००/- प्रति शिक्षणार्थी | ०.९६ |
| एकूण | | | १.२० |

## ६.२ सहभागीता हमी पध्दती (P.G.S.) करिता जिल्हास्तरावर प्रादेशिक परिषदेची निवड करणे ( R. C.)

प्रमाणिकरणासाठी नियुक्त केलेल्या प्रादेशिक परिषदेने प्रत्येक गटामधून गट प्रर्वतकाची (L.R.P.) निवड करणे, त्यांना प्रमाणिकरण व सेंद्रिय शेतीसाठी दुवा म्हणून विकसित करणे व सेंद्रिय शेती प्रमाणिकरणाची करावयाची सर्व आवश्यक कर्तव्य पार पाडणे ही कामे करावी लागतील. जिल्हयामध्ये प्रत्येक १० शेतकरी गटासाठी एक तज्ञ मार्गदर्शक नियुक्त करणे व कार्यरत ठेवणे ही प्रादेशिक परिषदेची जबाबदारी राहील. प्रमाणिकरणासाठी खालील बाबीसाठी अर्थसहाय्य देय राहील.

| अ.क्र. | बाब | अर्थसहाय्य (लाखामध्ये) |
|---|---|---|
| १ | विभागीय परिषदेच्या निरिक्षकाचे मानधन व प्रवास भत्ता | प्रति गट प्रति वर्ष रु. ०.२३१ (३ वर्षे ) |
| २ | विभागीय परिषद कार्यालय खर्च | प्रति गट प्रति वर्ष रु. ०.२० (३ वर्षे) |
| ३ | गट प्रवर्तक मानधन | प्रति प्रवर्तक प्रति माह रु. ०.०३ ( ३ वर्षे) |

### निरिक्षक विभागीय परिषद यांची कर्तव्ये व जबाबदाऱ्या :-

१. गटातील सर्व शेतकऱ्यांची पीजीएस पध्दतीमध्ये ऑनलाईन नोंदणी करणे, त्यासाठी लागणारी आवश्यक ती सर्व माहिती गटप्रवर्तकाच्या सहाय्याने सर्व सभासद शेतकऱ्याकडून संकलीत करणे.

२. पी.जी.एस. प्रमाणीकरणासाठी गटातील सर्व शेतकऱ्यांनी अवलंबलेल्या पध्दतीचे संकलन व ऑनलाईन नोंदविण्याचे सर्व कामकाज पार पाडणे. सभासदांनी त्यांचे शेतीचे सेंद्रिय रुपांतरण करण्यासाठी अनुसरलेल्या सर्व बाबी उदा. निविष्ठांचा वापर, पिकपध्दती इ. कामाची नोंदणी गटप्रवर्तकाच्या सहाय्याने ठेवून ती ऑनलाईन नोंदविणे.

३. प्रमाणीकरणासाठी आवश्यक निरिक्षण समिती गटाचे संमतीने निश्चित करणे. निरिक्षण समितीस मार्गदर्शन करुन सर्व निरिक्षणे पार पाडून घेणे व निरिक्षणाचा अहवाल ऑनलाईन पध्दतीने नोंदविणे.

४. गटांतील शेतकऱ्यांना सेंद्रिय शेतीमध्ये रुपांतरण करण्यासाठी करावयाच्या उपाययोजनाबद्दल तांत्रिक मार्गदर्शन करणे.

५. प्रमाणीकरणासाठी वेळेनुरुप आवश्यक ते सर्व कामकाज पार पाडणे.

**गटप्रवर्तकाचे कामकाज :-**

१. सेंद्रिय प्रमाणीकरणासाठी गटास सांघिक स्तरावर कराव्या लागणाऱ्या सर्व जबाबदाऱ्या पार पाडण्यासाठी कामकाज करणे.

२. विभागीय परिषद व गट यामध्ये दुवा म्हणून सर्व कामे विभागीय परिषदेच्या निरिक्षकाच्या मार्गदर्शनाखाली पार पाडणे.

३. गटातील सभासद शेतकऱ्यांचे मृदा नमुने गोळा करणे, सर्व माहितीचे संकलन करणे, प्रमाणीकरणासाठी सर्व नोंदवहया अद्ययावत करणे इ. कामे पार पाडणे.

४. सेंद्रिय शेतीमध्ये करावयाचे रुपांतरण व प्रमाणीकरण पध्दती याबाबतचे सर्व मार्गदर्शन घेणे व त्यानुसार गटाकरीता कामकाज पार पाडणे.

### ६.३ सेंद्रिय निविष्ठा निर्मिती व वापर

सेवा प्रदाता तज्ज्ञ मार्गदर्शकाच्या मार्गदर्शनाखाली गटातील शेतकयांना प्रशिक्षण देऊन सेंद्रिय शेती करण्यासाठी लागणाऱ्या आवश्यक निविष्ठा स्वतः करण्याच्या दृष्टीने प्रशिक्षण द्यावे. अशा निविष्ठा तयार करण्यासाठी लागणारे कल्चर मान्यताप्राप्त संस्थेकडून शेतकऱ्यांनी वापरावे, व ज्या सेंद्रिय निविष्ठा शेत परिस्थितीनुसार तयार करणे शक्य नसेल अशा पी.जी.एस. प्रमाणिकरणामध्ये मान्यता असलेल्या निविष्ठा शासकीय अथवा बाहय स्त्रोताकडून खरेदी करता येतील. सेंद्रिय निविष्ठा निर्मितीसाठी देय असलेले अनुदान हे ७० टक्के शेतकरी/गटाने उत्पादित केलेल्या निविष्ठासाठी देय राहील व उर्वरित ३० टक्के अनुदान बाहय स्त्रोताकडून खरेदी केलेल्या निविष्ठासाठी देय राहील. सेंद्रिय शेती निविष्ठासाठी असलेले अर्थसहाय्य गट/शेतक-यांना डी.बी.टी.व्दारे अदा केले जाईल.

सेंद्रिय निविष्ठा निर्मितीसाठी खालील बाबनिहाय कार्यक्रम अनुज्ञेय आहे. यामध्ये काही वेगळ्या बाबीची अंमलबजावणी करावयाचे असल्यास गटाचे विनंतीनुसार व प्रादेशिक परिषदेच्या शिफारसीनुसार मिशनच्या मान्यतेनुसार देय राहील.

| अ.क्र. | बाब | अर्थसहाय्य |
|---|---|---|
| १ | सेंद्रिय शेती रुपांतरणासाठी करावयाच्या उपाययोजना- मृद नमुना तपासणी, जैविक कुंपण, चर अथवा शेताच्या कडेने बांध घालणे. | खर्चाच्या १०० टक्के अथवा प्रति एकर जास्तीत जास्त रु. १०००/- यापैकी जे कमी असेल ते. |

| | | |
|---|---|---|
| २ | सेंद्रिय बियाणे संकलन अथवा सेंद्रिय पध्दतीने रोप निर्मिती करणे. | खर्चाच्या १०० टक्के अथवा प्रति एकर जास्तीत जास्त रु. ५००/- |
| ३ | हिरवळीच्या खतांची पिक लागवड करणे उदा. ताग, धैंच्या, ग्लिरिसिडीया इ. | खर्चाच्या १०० टक्के अथवा प्रति एकर जास्तीत जास्त रु. २०००/- |
| ४ | विविध कंपोस्ट पध्दतीचा अवलंब करुन सेंद्रिय घटक कुजवून खत निर्मिती करणे. उदा. नॅडेफ, बायोडायनॅमिक कंपोस्ट, व्हर्मिकंपोस्ट, इ. | खर्चाच्या ५० टक्के अथवा प्रति युनिट जास्तीत जास्त रु. ५०००/- |
| ५ | फॉस्फेट रिच ऑर्गेनिक मॅन्युअरचा (PROM) वापर | खर्चाच्या १०० टक्के अथवा प्रति एकर जास्तीत जास्त रु. १०००/- |
| ६ | जैविक खते, उदा. रायझोबियम, फॉस्फेट सोल्युबलायझिंग बॅक्टेरिया, पोटॅश सोल्युबलायझिंग बॅक्टेरिया, ॲझेटोबॅक्टर, ॲझोला, द्रवरुप जैविक संघ इ. | खर्चाच्या १०० टक्के अथवा प्रति एकर जास्तीत जास्त रु. ५००/- |
| ७ | जमिनीमध्ये सुक्ष्म जीवजंतुचे प्रमाण वाढविण्यासाठी स्थानिकरित्या विविध कल्चर निर्मिती व वापर उदा. जिवामृत, अमृतपाणी, बायोडायनॅमिक सिपीपी, ईएम, इ. साठी आवश्यक साहित्य व खर्च. | खर्चाच्या १०० टक्के अथवा प्रति एकर जास्तीत जास्त रु. १५००/- या मर्यादेत व्यक्तीगत अथवा गटाच्या स्तरावर केलेल्या उत्पादन केंद्रासाठी एकत्रित अनुदानावर देय. |
| ८ | पीकसंरक्षणासाठी करावयाच्या किड व रोग नियंत्रणासाठी वनस्पतीजन्य अर्क, मित्र किडनिर्मिती व वापर, बायोडायनॅमिक तरल किडरोधक निर्मिती व जैविक बुरशीनाशक निर्मिती इ. | खर्चाच्या १०० टक्के अथवा जास्तीत जास्त रु. १०००/- प्रति युनिट व्यक्तीगत अथवा गटाच्या स्तरावर सामुहिक रित्या निर्मित केंद्रासाठी एकत्रित अनुदानावर देय. |

| | | |
|---|---|---|
| ९ | जैविक किड व बुरशीनाशकांचा वापर उदा. ट्रायकोडर्मा व्हिरिड, स्युडोमोनास फल्युरोसन्स, बिव्हारिया, व्हर्टिसिलियम, एनपीव्ही हेलिकोव्हर्पा, ॲझॅडिरेक्टिन, इ. | खर्चाच्या १०० टक्के अथवा प्रति एकर जास्तीत जास्त रु. ५००/- |
| १० | स्थानिक परिस्थितीनुसार आवश्यक निविष्ठा निर्मिती | खर्चाच्या १०० टक्के अथवा जास्तीत जास्त रु. ५००/- प्रति एकर व्यक्तीगत अथवा गटाचे स्तरावर एकत्रितरित्या देय. |

सेंद्रिय निविष्ठा निर्मितीसाठी प्रति एकर रक्कम रू. ५५००/- या प्रमाणे एका लाभार्थीसाठी २ हेक्टर क्षेत्रासाठी ३ वर्षाकरिता अनुज्ञेय राहील व गटाचे ५० एकर क्षेत्रासाठी एकूण अनुज्ञेय अनुदान रू. ८,२५,०००/- एवढे राहील.गटाने सेवा प्रदाताच्या तज्ञ मार्गदर्शनाखाली प्रादेशिक परिषदेच्या शिफारशीने व्यक्तीगत/गटाच्या निविष्ठा निर्मितीचा आराखडा तयार करून जिल्हा व्यवस्थापक युनीट कडून मान्यता घेणे बंधनकारक राहील.

### ६.४ प्राथमिक व व्दितीय स्तर प्रक्रिया युनीट स्थापन करणे.

गटाने उत्पादित केलेल्या मालाचे प्राथमिक/व्दितीय प्रक्रिया करून विपणनक्षम माल निर्माण करणेसाठी गटाचे स्तरावर आवश्यक यंत्रसामुग्री उदा. धान्य प्रतवारी, मिनी दालमील, आईलमिल इत्यादी खरेदी करणेसाठी किमतीचे ५० टक्के अथवा जास्तितजास्त रू. २.०० लाख अनुदान गटस्तरावर अनुज्ञेय राहील. दोन किंवा त्यापेक्षा जास्त गटाने एकत्र येऊन समुह निर्मितीव्दारे उत्पादित मालाची प्रक्रिया करणेसाठी मोठया स्वरूपात प्रक्रिया केंद्र स्थापन करावयाचे असल्यास हे अनुदान गटांच्या समुहास देय राहील.

### ६.५ बाजारपेठेशी दुवा

गटाने उत्पादित केलेल्या मालाच्या विक्रीसाठी अन्न व औषध प्रमाणपत्र, ब्रॅडींग, पॅकेजींग, मालाचे विक्रीसाठी करावयाची प्रसिध्दी साहित्य इत्यादी बाबीसाठी प्रत्येक गटास रू. १.०० लाख देय राहील.

### ६.६ कृषि संशोधन

६.६.१ कृषि विद्यापीठ/कृषि विज्ञान केंद्र यांच्यामार्फत पुढील संशोधन करणे.

६.६.२ शेतावर उत्पादित निविष्ठाचे विश्लेषण.

६.६.३ पिक संरक्षणासाठी वापरल्या जाणाया किड रोधकांचे घटक निश्चित करणे.

६.६.४ उत्पादित फळे, भाजीपाला, अन्नधान्ये यांचे पोषक घटकांचे मापदंड निश्चित करणे.

६.६.५ सेंद्रिय निविष्ठांचा संशोधन पर अभ्यास, निष्कर्ष व शिफारसी करणे.

६.६.६ कुटुंबाचे आर्थिक आणि सामाजिक स्तरासंबंधीत अभ्यास करणे.

**६.७ <u>सेवा प्रदाता नियुक्ती</u>**

मिशन अंतर्गत निवडलेल्या जिल्हयामध्ये योजनेची अंमलबजावणी यशस्वीपणे करणेसाठी मिशन तर्फे सेंद्रिय शेती मध्ये अनुभव असलेल्या एका संस्थेची निवड सेवा प्रदाता म्हणून केली जाईल. या संस्थेचे कर्तव्य व जबाबदाऱ्या खालीलप्रमाणे राहतील.

६.७.१ समुह संकल्पनेनुसार गटाची व त्यामध्ये शेतकऱ्यांची निवड करुन गटाची बांधणी करणे.

६.७.२ गट प्रर्वतक व सहाय्यक गट प्रर्वतक यांचे प्रशिक्षणासाठी तज्ज्ञ मार्गदर्शक उपलब्ध करणे व प्रशिक्षणाचे आयोजन करणे.

६.७.३ गटातील शेतकयांचे प्रशिक्षणासाठी तज्ज्ञ मार्गदर्शकाची उपलब्धता करून देणे व प्रशिक्षणाचे आयोजन करणे.

६.७.४ गटाच्या सहकार्याने स्थानिक परिस्थितीनुरुप सेंद्रिय शेती निविष्ठा निर्मितीचा आराखडा तयार करणे त्यास प्रादेशिक परिषदेची शिफारस घेणे व जिल्हा प्रकल्प युनिटची मान्यता घेणे. आवश्यकतेनुसार नाविण्यपूर्ण बाबीची अंमलबजावणी असल्यास मिशनची मान्यता घेणे.

६.७.५ गटामध्ये तज्ज्ञामार्फत वर्षातून तीन वेळा भेटी देऊन अंमलबजावणीचा आढावा घेऊन व त्रूटीचे निराकरण करून घेणे व त्यानुसार प्रकल्प व्यवस्थापक युनीट व जिल्हा व्यवस्थापक युनीट यांना कळविणे.

६.७.६ गटाच्या प्राथमिक/व्दितीय प्रक्रिया केंद्रासाठी प्रकल्प अहवाल तयार करून देणे व त्यांच्या कर्ज मंजूरीस आवश्यक ते सहकार्य करणे तसेच कार्यान्वित वेळेत करणेसाठी संपूर्ण सहकार्य देणे.

६.७.७ गटाने उत्पादित मालाचे विपणन करणेसाठी ब्रॅडींग, पॅकेजिंग व इतर सर्व बाबींना संपूर्ण सहकार्य करणे.

६.७.८ प्रकल्प कालावधी संपल्यानंतर गटाचे कार्य सुरळीत राहण्यासाठी संसाधन निर्गमण व्यवस्था (Exit Plan) विकसित करणे.

६.७.९ गटांचे उत्पादित मालाचे सशक्त विपणन व्यवस्था करणेसाठी काही गटांचे एकत्रित Farmer Producer Company यांची स्थापना करून देणे.

**(७) <u>मुल्यमापन, यशोगाथा</u> :-**

७.१ मिशन कालावधीचे शेवटच्या टप्यात कामाचे मुल्यमापण त्रयस्थ संस्थेव्दारा करणे.

७.२ जैविक शेतीच्या यशोगाथांची निर्मिती, प्रचार/प्रसिध्दी.

८) आर्थिक तरतूद :-

| अ.क्र | घटक | प्रथम वर्ष | द्वितीय वर्ष | तृतीय वर्ष | चतुर्थ वर्ष | अर्थसंकल्पीय तरतूद (रु.लाखात) |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | क्षमता संवर्धन | २००.०० | १६०.०० | १६०.०० | ८०.०० | ६००.०० |
| २ | सेंद्रीय शेती पध्दती अवलंब करण्यासाठी सेंद्रीय निविष्ठा निर्मिती व वापर. | ८७५.०० | २०००.०० | ७५०.०० | ५००.०० | ४१२५.०० |
| ३ | सेंद्रिय प्रमाणिकरण | २१०.५० | ४१०.५० | ४१०.५० | १५५.०० | ११८६.५० |
| ४ | बाजारपेठेशी दुवा | ०.०० | २५०.०० | २५०.०० | ०.०० | ५००.०० |
| ५ | प्राथमिक व द्वितीय स्तर प्रक्रिया युनीट स्थापन करणे | ०.०० | ५००.०० | ५००.०० | ०.०० | १०००.०० |
| ६ | कृषि संशोधन | ५०.०० | ५४.०० | ५०.०० | ०.०० | १५४.०० |
| ७ | प्रकल्प व्यवस्थापन युनीट | ३००.०० | ३२५.०० | २७५.०० | २००.०० | ११००.०० |
| ८ | **सेवा प्रदाता** | १८०.०० | १८५.५० | १८५.५० | १८०.०० | ७३१.०० |
| ९ | आकस्मिक खर्च | १९५.०० | १४५.०० | १४५.०० | ११८.५० | ६०३.५० |
| | **एकूण** | **२०१०.५०** | **४०३०.००** | **२७२६.००** | **१२३३.५०** | **१०,०००.००** |

कार्यन्वयन व अंमलबजावणी करीता शासकीय निधी कृषि आयुक्तालय, पुणे यांचे मार्फत मिशन प्रकल्प मॅनेजमेंट बोर्ड (MPMB) यांचे कडे उपलब्ध करण्यात येईल. वर्षनिहाय व घटकनिहाय तरतूदीमध्ये बदल आवश्यक असल्यास मिशनच्या प्रस्तावाच्या अनुषंगाने शासन स्तरावर निर्णय घेण्यात येईल. तसेच, योजना राबविताना काही अनुषंगीक बदल आवश्यक असल्यास शासन स्तरावर निर्णय घेण्यात येईल.

प्रकल्प कालावधीत गरजेनुसार सुधारणा ह्या मिशन प्रोजेक्ट मॅनेजमेंट बोर्ड चे मान्यतेने करण्यात येतील. तसा प्रस्ताव शासनास कृषि आयुक्तालया मार्फत सादर करण्यात यावा.

सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक १५६/१४३१, दिनांक २४/०९/२०१८ आणि वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक २२५/२०१८/व्यय-१, दिनांक १२/१०/२०१८ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८१०१६१७४६२३६३०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Prakash R. Kadam

Digitally signed by Prakash R. Kadam
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Agriculture And Adf Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=944e446a6b36b86a52f12def26aa74e1d37e674 33a0ce27e6a2caf774b9795c6, cn=Prakash R. Kadam
Date: 2018.10.16 18:42:14 +05'30'

**( प्रकाश रा. कदम )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१.अपर मुख्य सचिव (वित्त), मंत्रालय, मुंबई
२.अपर मुख्य सचिव (सा.प्र.वि.), मंत्रालय, मुंबई
३.अपर मुख्य सचिव (कृषि), मंत्रालय, मुंबई
४.कुलगुरु, डॉ. पंदेकृवि, अकोला
५.आयुक्त (कृषि ), महाराष्ट्र राज्य, पुणे
६.आयुक्त, पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे
७. कृषि संचालक (निविष्ठा व गुणनियंत्रण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पूणे
८. कृषि संचालक (आत्मा), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पूणे
९.विभागीय आयुक्त, अमरावती विभाग, अमरावती
१०. विभागीय सह संचालक अमरावती / नागपूर
११. संबंधित जिल्हा अधीक्षक कृषि अधिकारी
१२. संबंधित प्रकल्प संचालक (आत्मा)
१३. क्षेत्रीय व्यवस्थापक प्रादेशिक जैविक खेती केंद्र, नागपूर
१४.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) १/२, महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
१५.महोलखापाल (लेखा परिक्षा) १/२, महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
१६. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी